"महाराष्ट्र अनुसुचित जमातीच्या भोगवट दारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम ,१९६९ या अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने "
(०६८६ २४०६) .

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१७/प्र.क्र.४५१/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १९.०७.२०१७.

**वाचा :-**

१) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/प्र.क्र.३७/५१६/२०१७-१८, दिनांक १२.०६.२०१७.
२) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/प्र.क्र.३७/६१८/२०१७-१८, दिनांक २३.०६.२०१७.
३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि.३०.०६.२०१७.

**प्रस्तावना :**

"महाराष्ट्र अनुसुचित जमातीच्या भोगवट दारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ या अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) सदरची योजना सन २०१७-१८ पासून योजनेत्तर मधून योजनांतर्गत वर्ग करण्यात आलेली आहे. सन २०१७-१८ साठी सदर योजनांतर्गत एकुण रु. ५००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या उपरोक्त पत्रान्वये अनुसुचित जमातीच्या भोगवट दारांना झाडांची विक्री करणे या योजने अंतर्गत गडचिरोली वनवृत्तासाठी रु. १२३.१९ लक्ष, अमरावती वनवृत्तासाठी रु. ०.५० लक्ष, यवतमाळ वनवृत्तासाठी रु.१००.०० लक्ष, ठाणे वनवृत्तासाठी रु. १०.०० लक्ष व नागपूर वनवृत्तासाठी रु. १३५.२१ लक्ष असे एकूण रु.३६८.९० लक्ष रकमेचा नवीन / चालू बाब प्रस्ताव शासनास मंजूरी तथा निधी वितरणासाठी सादर केला आहे.

वित्त विभागाच्या दिनांक ३०.०६.२०१७ रोजीच्या परिपत्रकानुसार, सन २०१७-१८ मध्ये महसूली खर्च शीर्षांतर्गत अर्थसंकल्पित निधीच्या ७० % मर्यादेत निधीचे वितरण करण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. त्यानुसार अर्थसंकल्पित असलेल्या रु. ५००.०० लक्ष (०२ मजूरी- रु. २७.५० लक्ष व ५० इतर खर्च - रु. ४७२.५० लक्ष) निधी पैकी ७० % च्या मर्यादेत रु. ३५०.०० लक्ष इतका निधी वितरणासाठी उपलब्ध असून सदरचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:**

सन २०१७-१८ करिता "महाराष्ट्र अनुसुचित जमातीच्या भोगवट दारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ या अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) या योजनेअंतर्गत एकूण रु. ५००.०० लक्ष अर्थसंकल्पीत निधीच्या ७० % मर्यादेत प्रस्तावांतर्गत गडचिरोली, अमरावती, यवतमाळ, ठाणे व नागपूर वनवृत्तासाठी प्रस्तावानुषंगाने मागणी केलेल्या रुपये ३६८.९० लक्ष पैकी रुपये ३५०.०० लक्ष (०२ मजूरी- रु. १९,२५,०००/- + ५० इतर खर्च रु. ३,३०,७५,०००/-) इतका निधी पुढील तपशिलानुसार तसेच अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

| अक्र. | वनवृत्त | प्रस्तावित रक्कम (रुलाखात .) | वितरित रक्कम (रुलाखात .) |
|---|---|---|---|
| १ | गडचिरोली | १२३.१९ | १२३.१९ |
| २ | अमरावती | ०.५० | ०.५० |
| ३ | यवतमाळ | १००.०० | १००.०० |
| ४ | ठाणे | १०.०० | १०.०० |
| ५ | नागपूर | १३५.२१ | ११६.३१ |
| **एकूण एकंदर** | | **३६८.९०** | **३५०.००** |

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.

२) यामध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.

३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.

४) सदर मान्यता ही सन २०१७-१८ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.

सदर खर्च हा मागणी क्रमांक - सी-७, २४०६ वनीकरण व वन्य जीवन ८०० इतर खर्च, (०१) इतर खर्च, (०१) (०५) "महाराष्ट्र अनुसुचित जमातीच्या भोगवटदारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१७-१८ मध्ये मंजूर अर्थसंकल्पित अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ३०.०६.२०१७ रोजीचे परिपत्रक आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७(२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१९१६३७३२१०१९ असा आहे .हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.07.19 16:33:41 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर/ गडचिरोली/ अमरावती/यवतमाळ/ठाणे.
५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
६) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

८) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

९) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.